महाराष्ट्र बांबू विकास मंडळाकरीता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. बांबू-२०१७/प्र.क्र. २१०/फ-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १९ मे, २०१७**

**वाचा :-** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१७.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१ / पी / यो / नबाप्र / प्र.क्र.७३ (बांबू मंडळ)/२१२/१७-१८, दि.९.५.२०१७.

**प्रस्तावना :-**

सन २०१७-१८ करिता "महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना" (२४०६ A१८५) या योजनेकरिता एकूण रु.१९४.९७ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पित निधीच्या अनुषंगाने रु.१९४.९७ लक्ष रक्कमेचा चालु प्रस्ताव संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला असून प्रस्तावांतर्गत निधी वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या दि.१८.०४.२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये, सन २०१७-१८ करिता महसूली खर्च शीर्षांतर्गत योजनांकरिता ८० % मर्यादेत निधी वितरित करण्याकरिता मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने, संदर्भ क्र.२ येथील दि.०९.०५.२०१७ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव विचारात घेता "महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना" (२४०६ A१८५) या लेखाशीर्षाअंतर्गत वित्त विभागाच्या सुचनांनुसार रू. १५५.९८ लक्ष (०१-वेतन रू. २६.५१ लक्ष, ०२- मजूरी रू.५१.४७ लक्ष, १३-कार्यालयीन खर्च रू. २८.०७ लक्ष, १४- भाडेपट्टी व कर रू. ९.३६ लक्ष, २६- जाहिरात व प्रसिध्दी रू. २१.०६ लक्ष, २७-लहान बांधकामे रू. ७.०२, २८-व्यावसायीक सेवा रू.१२.४९ लक्ष) इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. मागील वर्षी सदर योजनेकरिता

वितरित केलेल्या निधीच्या विनयोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील दि.१८.०४.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तीची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी सी-७, प्रधान शिर्ष २४०६, वनीकरण व वन्यजीवन, १०५ वनोत्पादने, ०१ शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन, (०१) (०८) महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६ A१८५) या लेखा शिर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.१८.०४.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१९१६५५४०३५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2017.05.19 16:59:14 +05'30'

**(सुजय दोडल)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर.
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
६. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
७. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)